**यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे रत्नागिरी येथील उपकेंद्र, व छत्रपती शिवाजी महाराज आंतरराष्ट्रीय ग्रंथालय व संशोधन केंद्र इमारतींचे बांधकाम करण्याकरीता विधीमंडळाच्या डिसेंबर-२०२१ च्या हिवाळी अधिवेशनात अर्थसंकल्पित झालेला निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. भुखंड-२०२१/प्र.क्र.१८/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १७ फेब्रुवारी, २०२२.

<u>वाचा :-</u> विभागाचे समक्रमांकाचे दि.२५.११.२०२१ रोजीचा शासन निर्णय.

**<u>प्रस्तावना :-</u>**

यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक विद्यापीठाची स्थापना महाराष्ट्र विधी मंडळ कायदा क्र.२० अन्वये दि.०१.०७.१९८९ रोजी झाली आहे. विद्यापीठ अनुदान आयोगाची मान्यता असलेल्या या विद्यापीठाचे कार्यक्षेत्र संपूर्ण महाराष्ट्र राज्य आहे. महाराष्ट्रात या विद्यापीठाची अमरावती, नागपूर, औरंगाबाद, मुंबई, नाशिक, पुणे, कोल्हापूर व नांदेड असे ८ विभागीय केंद्र कार्यरत आहेत. विद्यापीठाच्या ८ विभागीय केंद्रामार्फत १६०० अभ्यासकेंद्रावर नियंत्रण ठेवले जाते. विद्यापीठाची जवळपास ६ लक्ष इतकी विद्यार्थी संख्या आहे. विद्यापीठ राबवित असलेले शिक्षणक्रम, विविध उपक्रम, शिक्षणापासून वंचित असणाऱ्या सर्व घटकांसाठी उच्च शिक्षण पोहोचविण्यासाठी विद्यापीठ करीत असलेले प्रयत्न इ.बाबी लक्षात घेता या विद्यापीठाच्या अभ्यास केंद्रांवर नियंत्रण ठेवण्याच्या अनुषंगाने तसेच विद्यापीठात विविध शिक्षणक्रमांना प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांना पुस्तकांच्या रुपाने अध्ययन साहित्य पुरविण्याकरिता उपकेंद्रातर्गत असलेल्या अभ्यास केद्रांवर अध्ययन साहित्य उप केंद्रांमार्फत त्वरित व वेळेत पोहोचविण्याच्या उद्देशाने कोल्हापुर विभागातंर्गत रत्नागिरी व सिंधुदुर्ग या दोन जिल्ह्यासाठी विद्यापीठाचे उपकेंद्र स्थापन करण्याचे प्रस्तावित होते.

सदर उपकेंद्राकरिता बी.एड कॉलेज परिसरातील बोर्डिंगलगतची दक्षिण-उत्तर कोपऱ्यातील मौजे झाडगाव म्यु.आत येथील सर्व्हे नं.२५९/१(सि.स.ऩ ८६०.८६०/१ ते.८६०/६ मधील क्षेत्र ४.३८०० हे. आर. या मिळकतीतील ब्लॉक डी मधील पाण्याच्या टाकी जवळील भुखंड क्षेत्रफळ ५,००० चौ. मी. जागा उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे. सदर जागेवर विद्यापीठाचे उपकेंद्र व छत्रपती शिवाजी महाराज आंतरराष्ट्रीय ग्रंथालय व संशोधन केंद्र स्थापन करण्यासाठी इमारत बांधकामासाठी रु.१२३९.४३ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भाधिन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आता विद्यापीठाचे उपकेंद्र व छत्रपती शिवाजी महाराज आंतरराष्ट्रीय ग्रंथालय व संशोधन केंद्र स्थापन करण्यासाठी इमारत बांधकामासाठी येणाऱ्या खर्चासाठी विधानमंडळाच्या डिसेंबर, २०२१ च्या अधिवेशनात सन २०२१-२२ करीता पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला रु.८६,९५,०००/- (अक्षरी रुपये शहाऐंशी लक्ष पंच्यान्नव हजार फक्त) वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

बी.एड कॉलेज परिसरातील बोर्डिंगलगतची दक्षिण-उत्तर कोपऱ्यातील मौजे झाडगाव येथे यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे कोल्हापूर विभागातंर्गत रत्नागिरी व सिंधुदूर्ग या दोन जिल्ह्यासाठी उपकेंद्र व छत्रपती शिवाजी महाराज आंतरराष्ट्रीय ग्रंथालय व संशोधन केंद्र स्थापन करण्यासाठी इमारतींच्या बांधकामासाठी रु.८६,९५,०००/- (अक्षरी रुपये शहाऐंशी लक्ष पंच्यान्नव हजार फक्त) इतका निधी खालील अटींच्या अधिन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१. हा निधी प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच वितरीत तथा आहरीत करण्यात यावा.
२. चालू आर्थिक वर्षात विधीमंडळाच्या निदर्शनास आणलेल्या कामनिहाय तरतूदीपेक्षा जादा खर्च करण्यात येऊ नये.

३. कोणत्याही परिस्थितीत संबंधित अधिक्षक अभियंता यांनी प्रशासकीय मान्यतेच्या रकमेपेक्षा जास्त खर्च कामांवर करु नये.

४. संबंधित कार्यकारी अभियंता यांनी कामाची प्रगती व झालेला खर्च याचा अहवाल संबंधित विद्यापीठाचे कुलसचिव व संचालक, उच्च शिक्षण यांच्याकडे पाठविण्याची व्यवस्था करावी.

५. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

३. हा निधी सार्वजनिक बांधकाम विभागाने विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन वितरीत करावा. निधी वितरीत करतांना वरील अटी व शर्ती विचारात घ्याव्यात. तसेच वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२, नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

४. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा. तसेच विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

५. सदरहू बांधकामावर होणारा खर्च "मागणी क्रमांक - एच-८, मुख्यलेखाशिर्ष- ४२०२ शिक्षण, सर्वसाधारण शिक्षण २०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण (४२०२००७९) या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.९१/२०२२/व्यय-५, दि.२८.०१.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२२०२१८११२७१५०००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2022.02.18 11:28:27 +05'30'

**( अ. म. बाविस्कर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे उपसचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. कुलगुरू, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक
४. कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक
५. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रत्नागिरी.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी.
८. कार्यासन अर्थसंकल्प-२, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (व्यय) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११. उप सचिव (विशि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती.